केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियान या योजनेंतर्गत अनुसूचित जमाती प्रवर्गाकरीता सन २०१८-१९ या आर्थिक वर्षातील केंद्र व राज्य हिश्श्याचा निधी वितरीत करण्यास मान्यता.
(केंद्र हिस्सा -२५०१ २९६२, राज्य हिस्सा २५०१ २७९३ व २५०१ २८०१)

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय, क्रमांकः बीयुडी-२०१८/प्र.क्र.१८/कार्यासन ६
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक: - २२ जानेवारी, २०१९.

**वाचा -**

१) शासन परिपत्रक, वि. वि, क्र.अर्थसं-२०१८ / प्र.क्र.६९ / अर्थ-३, दि. ०२.०४.२०१८.
२) केंद्र शासन, ग्राम विकास मंत्रालय यांचे पत्र, क्र. NO.J-12025/01/2018-RL (NRLM_45C), दि.३१.१२.२०१८.
३) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग समक्रमांक दि.१३.०६.२०१८
४) ग्राम विकास विभागाची नस्ती क्र.मजिअ-२०१८/ प्र.क्र.८८/ यो-३.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियानाकरीता सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात मागणी क्र.टी-५, २५०१-विशेष ग्राम विकास कार्यक्रम,०१-एकात्मिकृत ग्राम विकास कार्यक्रम, ७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना, ०१-जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना, (०१)(०७)-महाराष्ट्र राज्य ग्रामीण उपजिविका अभियानासाठी वित्तीय सहाय्य (केंद्र हिस्सा) (२५०१ २९६२), ३३-अर्थसहाय्य या लेखाशीर्षाखाली एकूण रू. ५०४०.०० लाख, राज्य हिश्श्याच्या (०१)(०४)- महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान (२५०१ २७९३), ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली रू.२२००.०० लाख व (२५०१ २८०१), ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली रू.१०९.०० लाख इतकी तरतूद अर्थसंकल्पित आहे. सदर तरतुदीतून सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात केंद्र हिश्श्याच्या (२५०१ २९६२) या लेखाशीर्षाखाली रू.१०७१.२० लाख ( रु. दहा कोटी, एकाहत्तर लाख, वीस हजार फक्त ) इतका व राज्य हिश्श्याच्या (२५०१ २७९३) या लेखाशीर्षाखाली रू.७१४.१३ लाख (रु.सात कोटी, चौदा लाख तेरा हजार फक्त) इतका निधी ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना संदर्भीत क्र.३ येथे नमूद शासन निर्णयान्वये अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर (BEAMS ) वितरीत करण्यात आलेला आहे.

२. प्रस्तुत प्रकरणी ग्रामविकास विभागाच्या संदर्भीत क्र.४ येथील प्रस्तावास अनुसरुन केंद्र शासनाच्या राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियानाकरीता सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात दुसऱ्या हप्त्यापोटी केंद्र हिस्सा, (२५०१ २९६२ ), ३३- अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखाली रु. ३४५९.६७ लाख (रु. चौतीस कोटी, एकोणसाठ लाख, सदुसष्ट हजार फक्त), तसेच समरुप राज्य हिस्स्यासाठी (२५०१ २७९३ ), ३३- अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखाली रु. १४८५.८७ लाख **व** (२५०१ २८०१), ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली रू.१०९.०० लाख असा एकूण रु.१५९४.८७ लाख (रु. पंधरा कोटी, चौऱ्यान्नव लाख, सत्याऐंशी हजार फक्त) इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS ) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. नियंत्रण अधिकारी / विभागप्रमुख यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार सदर निधी याच वर्षात खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; संबंधित अपर

आयुक्त, आदिवासी विकास; आदिवासी विकास विभाग व ग्रामविकास विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत सूचना देण्यात यावी.

३. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील क्षेत्रात विविध योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी उपयोजना क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर लक्ष ठेवता येईल.

४. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतुन आदिवासी उपयोजना क्षेत्रात पायाभूत सविधा निर्माण करण्याबाबतच्या तसेच वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात आणि आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील क्षेत्रात फक्त वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाने **वाचा** येथील क्रमांक १ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१६/ अर्थोपाय, दि.८.०१.२०१९ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१२११७०२०२७९२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Ravindra Digambarrao Aute

Digitally signed by Ravindra Digambarrao Aute
DN: cn=Ravindra Digambarrao Aute, o=Tribal Development Department, ou=Government of Maharashtra, email=rajendra.aute@nic.in, c=IN
Date: 2019.01.22 15:06:41 +05'30'

रविंद्र दि. औटे
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. प्रधान सचिव, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई
२. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
३. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग.
४. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
५. महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
६. विभागीय आयुक्त, मुंबई / नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती/ पुणे.
७. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
०९. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०. ग्रामविकास विभाग, योजना- ०३, मंत्रालय, मुंबई.
११. कार्यासन अधिकारी, (का. २/१७/ )/निवड नस्ती (का.६),आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.